# शेतक-यांचा लढा हा आपलाही लढा आहे!

# या लढ्याला पाठिंबा देऊया!!



# शेतकऱ्यांचा लढा हा आपलाही लढा आहे!
# या लढ्याला पाठिंबा देऊया!!

*नीरज जैन*



दिल्लीच्या सीमेवर शेतकऱ्यांनी आपला महासंग्राम सुरू केल्याला आता 50 दिवस झाले आहेत. पुरुष, महिला, मुले आणि वृद्धांसह कित्येक लाख शेतकरी देशाच्या राजधानीच्या सीमेवर ऐतिहासिक धरण्यावर बसले आहेत. काही महिन्यांपूर्वी मोदी सरकारने जे तीन शेतीविषयक कायदे देशाच्या माथी मारले आहेत त्यांना मागे घेण्याची मागणी शेतकरी करत आहेत. देशातील सत्ताधाऱ्यांच्या धोरणाला इतकं जोरदार आणि स्फुर्तीदायक आव्हान आपण खूप काळानंतर पाहत आहोत. या आंदोलनाने फक्त शेतकऱ्यांच्याच नव्हे तर सर्व कष्टकऱ्यांच्या मागण्या उचलल्या आहेत, आणि म्हणून हा लढा अधिक प्रेरणादायी झाला आहे.

केंद्रात सत्तेवर असलेल्या फॅसिस्ट सरकारने असा विचार केला असावा की दिल्लीच्या हिवाळ्यातील थंडीत, शेतकऱ्यांना मोकळ्या ठिकाणी, उघड्यावर तळ ठोकायला भाग पाडून त्यांची इच्छाशक्ती मोडली जाऊ शकते. पण फॅसिस्टांना काय माहित बंधुत्वाच्या सामर्थ्यामध्ये बोचणाऱ्या थंडीला विरोध करण्यासाठीचा उबदारपणा आहे ते. आणि त्याशिवाय, आपले चैतन्य वाढवण्यासाठी त्यांच्याकडे चळवळीची गाणी, घोषणा, रॅली, त्यांची पर्यायी माध्यमे, कबड्डी सामने, स्कीट आणि नाटकं आहेतच. व्यक्तिवाद, जातीवाद, गुंडगिरी, द्वेष, भेदभाव ह्या आणि अशा सडलेल्या मूल्यांच्या खुराकीवर वाढलेल्या फॅसिस्टांना या सर्व गोष्टींबद्दल काहीच माहिती नसते.

सुरुवातीला मोदी सरकारने दिल्ली शहरावर जणू काही शत्रुसैन्याचा हल्ला होत आहे अशा थाटात मोर्चेबांधणी केली, अहिंसक शेतकऱ्यांवर अश्रूधूर आणि पाण्याच्या फवाऱ्यांचा मारा केला, पण आंदोलनाच्या ताकदीपुढे त्यांना भूमिका बदलायला लागली. शेतकऱ्यांना बिनशर्त वाटाघाटींसाठी बोलवावे लागले. या सरकारचे चारित्र्य पाहता, हा फक्त वेळ काढण्याचा आणि आंदोलकांना थकवण्याचा एक डावपेच होता. खरे तर त्यांची मूलभूत धोरणे बदलण्याचा सत्ताधाऱ्यांचा कोणताही हेतू नाही. असे असले तरी, गृहमंत्री अमित शहा यांच्या नेतृत्वाखाली केंद्र सरकारने वाटाघाटी सुरू केल्या आहेत, हा देखील शेतकरी आंदोलनाचा काही छोटा विजय नाही. शेतकऱ्यांच्या आंदोलनाला देशभरातून पाठिंबा मिळत आहे आणि लोक शेतकऱ्यांच्या समर्थनार्थ मोर्चे काढत आहेत.

तीन नव्या कृषी कायद्यांवरील मुख्य आक्षेप काय आहेत, त्यांचा शेतकऱ्यांवर, सर्व सामान्य कष्टकरी जनतेवर आणि देशावर काय परिणाम होणार आहे, हे खाली थोडक्यात मांडलं आहे.

**तीन कृषी कायदे**

शेतकऱ्यांचा देशव्यापी निषेध व विरोधी पक्षांनी विरोध दर्शविला असूनही संसदेतील लोकशाही प्रक्रियेला डावलून भाजप सरकारने मंजूर केलेले तीन कायदे म्हणजे:

- Farmers' Produce Trade and Commerce (Promotion and Facilitation) Act {किंवा, शेतकरी उत्पादन व्यापार व वाणिज्य (प्रोत्साहन व सुलभता) कायदा म्हणजे कृषी उत्पन्न बाजार समितीला बगल देणारा कायदा};
- Farmers (Empowerment and Protection) Agreement on Price Assurance and Farm Services Act –{शेतकरी (सबलीकरण आणि संरक्षण) किंमत हमी आणि शेती सेवा कायदा म्हणजे करारावर कंत्राटी शेतीला प्रोत्साहन देणारा कायदा}; आणि
- Essential Commodities (Amendment) Act – {अत्यावश्यक वस्तू (सुधारणा) कायदा (थोडक्यात सांगायचं तर साठेबाजी आणि काळाबाजारीला कायदेशीर मान्यता देणारा कायदा)}

**कृषी उत्पन्न बाजार समितीला बगल देणारा कायदा: खरंच मुक्तबाजाराला वाव देणार का ?**

या कायद्यामुळे आज भारतात उभी असलेली शेतमाल खरेदी-विक्रीची संपूर्ण यंत्रणाच संपुष्टात येणार आहे. कृषी उत्पन्न बाजार समिती (APMC किंवा एपीएमसी) ही राज्य सरकारने मान्य केलेली अशी बाजारपेठ आहे, जिथे शेतकरी आपला माल परवानाधारक लोकांना किंवा आडत्यांना विकू शकतात. याच बाजारामध्ये गरीबांपर्यंत स्वस्त अन्नधान्य पोहोचवणाऱ्या रेशनव्यवस्थेसाठी धान्याची खरेदी होते. नवीन कायद्यामुळे शेतकऱ्यांना बाजारसमितीच्या बाहेर असलेल्या कोणत्याही बाजारात माल विकण्याची परवानगी मिळणार आहे.

सरकारचा दावा आहे की असे केल्यामुळे शेतकरी आता बाजार समितीला बांधील न राहता देशभरातील मुक्त बाजारात कुठेही आपला माल विकून उत्तम किंमत मिळवू शकतात.

हा दावा मूर्खपणाचा आहे. या देशात 86% शेतकऱ्यांकडे पाच एकरपेक्षा कमी जमीन असताना अशी अपेक्षा करणे की सामान्य शेतकरी उदा. महाराष्ट्रातील साताऱ्यातील शेतकरी बैलगाडीत आपला माल भरून मध्यप्रदेशातील इंदूरला जाऊन विकेल किंवा पंजाबच्या लुधियानात जाऊन विकेल, हे हास्यास्पद आहे. स्वतःच्या राज्यातही दूरच्या बाजारात चांगला भाव मिळत असल्याचे ठाऊक असले तरी दूर जायला ते तयार नसतात. खरे तर छोट्या शेतकऱ्याला आपला माल लवकरात लवकर विकण्याची गरज असते.

म्हणूनच राष्ट्रीय कृषी आयोगाने (National Commission on Farmers) अशी शिफारस केली होती की प्रत्येक शेतकऱ्यापासून 5 कि.मी. पेक्षा कमी अंतरावरच कृषी उत्पन्न बाजार समिती असली पाहिजे.

**बिहार: 2006 मध्ये कृषी उत्पन्न बाजार समिती कायदा बरखास्त केला**

केंद्र सरकार आज जे देशभरात करू पाहत आहे ते बिहारमध्ये आधीच अंमलात आले आहे. 2006 मध्ये बिहार राज्याने कृषी उत्पन्न बाजार समिती कायदा रद्द केला आणि कृषी उत्पन्न बाजार समिती बरखास्त केली. सरकारचा असा दावा होता की त्यामुळे दलाल निघून जातील, बाजार व्यवस्था अधिक कार्यक्षम होईल, शेतकऱ्यांना मालासाठी जास्त भाव मिळेल आणि शेतीमध्ये खाजगी कंपन्यांची गुंतवणूक वाढेल. 14 वर्षे झाली, बिहारचे शेतकरी अजूनही हा चमत्कार घडण्याची वाट पाहत आहेत.

- शेती क्षेत्रात खाजगी गुंतवणूक वाढली नाही.
- राज्यामध्ये, रस्त्याच्या कडेला कुठल्याही पायाभूत सुविधा नसताना शेकडो खाजगी मंड्या उभ्या राहिल्या आहेत. रस्त्यावर उभे राहण्याची जागा सोडली तर शेतकऱ्यांसाठी मालाच्या विक्रीसाठी कोणतीही आवश्यक सुविधा या ठिकाणी नाही.
- बिहारमधील शेतकऱ्याला दूरच्या बाजारात जाणे परवडत नाही म्हणून जवळच्या मंड्यांमध्ये ते स्वतःचा माल विकतात.
- या मंड्यांमध्ये बोली लावली जात नाही. शेतकऱ्यांना व्यापारी अत्यंत कमी भाव देतात.
- जर काही गैरव्यवहार झाला तर शेतकऱ्यांना फिर्याद करायला कुठेच जागा नाही.

बिहार भारतातील मक्याच्या उत्पादनात अग्रगण्य राज्य आहे. ह्या वर्षी (2020) मक्याचा जाहीर हमीभाव क्विंटलला 1850/- रुपये असताना बहुतेक शेतकऱ्यांना 1000-1300 रुपये इतकाच मिळाल्याची नोंद आहे. गव्हासाठीही बिहारमधील शेतकऱ्यांना हमीभावापेक्षा 10-15% कमी भाव मिळत आहे.



बिहारमध्ये मुक्त बाजार सुधारणा पूर्णपणे अपयशी ठरल्या आहेत हे स्पष्टच आहे. गेल्या वर्षी राज्यसभेत कृषिमंत्री नरेंद्रसिंग तोमर यांनी दिलेल्या आकडेवारीवरूनही हे सिद्ध होते. ते म्हणाले की देशात बिहारमधील शेतकऱ्यांचे उत्पन्न सर्वात कमी आहे. बिहारमध्ये शेतकरी कुटुंबाचे सरासरी मासिक उत्पन्न फक्त 3558 रुपये आहे. हरियाणामध्ये हा आकडा 14,343 रुपये व पंजाबमध्ये हा आकडा 18,000 रुपयांच्या वर आहे. कारण पंजाब, हरियाणामध्ये देशातील सर्वोत्तम कृषी उत्पन्न बाजार समितीचे जाळे आहे. यातून हे सिद्ध होते की मुक्त बाजारामुळे शेतकऱ्यांना फायदा होतो ह्या

म्हणण्याला काही अर्थ नाही.

बिहारची शेती किती संकटग्रस्त आहे याचा अंदाज आपल्याला बिहारमधून पोटापाण्यासाठी बाहेर पडलेल्या आणि इतर राज्यांमध्ये स्थायिक झालेल्या लाखो स्थलांतरित मजूरांवरूनच येतो. कोरोना लॉकडाऊनच्या काळात सर्वात जास्त स्थलांतरित मजूर बिहारला परतले.

**अमेरिका आणि युरोपमध्येही 'मुक्त बाजार' शेतकऱ्यांचे कल्याण करण्यात अपयशी!**

जगभरात कोणत्याही देशात शेतमालाच्या मुक्त बाजारामुळे शेतकऱ्यांचा फायदा झाल्याचे दिसून येत नाही - अगदी पाश्चात्य विकसित देशांमध्येही नाही. युरोप-अमेरिकेमध्ये किमान समर्थन मूल्य (एमएसपी) नाही, आणि साठेबाजीवर कोणतेही नियंत्रण नाही.

तीन कृषी सुधारणा कायद्यांद्वारे मोदी सरकार जी बाजारपेठ भारतात आणू इच्छिते, अगदी तशीच पूर्णपणे मुक्त बाजारपेठ तेथे आहे. या मुक्त बाजारावर कोणत्याही प्रकारचा सरकारी अंकुश नाही, कृषी उत्पन्न बाजार समिती, हमीभाव आणि साठेबाजीवर लगाम नाही. तरीही या देशांमधील शेतकरी संकटग्रस्त आहे. 2018 साली तेव्हाचे अमेरिकेच्या कृषी मंत्रालयाचे मुख्य अर्थतज्ञ रॉबर्ट जोहान्सन असे म्हणाले की "1960 पासून महागाईच्या तुलनेत शेतकऱ्यांचे उत्पन्न वेगाने घसरले आहे." दिवाळखोर शेतकऱ्यांचे एकूण नुकसान 42,500 कोटी डॉलर इतके आहे! अमेरिकन शेतकरी कसाबसा जगतोय, शेती करणाऱ्या पुरुषांमध्ये आत्महत्यांचे प्रमाण एकूण जनतेच्या सरासरीच्या प्रमाणात दीड पट आहे.

त्यामुळे विकसित देशांमधील शेती आज केवळ त्या देशांच्या सरकारांनी दिलेल्या प्रचंड अनुदानावर टिकून आहे. 2018 मध्ये जगातील 37 सर्वात श्रीमंत विकसित देशांच्या सरकारांनी शेतीला दिलेल्या एकूण अनुदानाचा आकडा 24,600 कोटी डॉलर इतका होता.

जागतिक आणि भारतीय पातळीवरील परिस्थिती माहित असूनही मोदी सरकार भारतीय शेतीमध्ये मुक्त बाजाराचं धोरण पुढेच रेटत आहे.

**वस्तुस्थिती - बहुसंख्य भारतीय शेतकरी मुक्त बाजारातच आहेत!**

पण भारतात वस्तुस्थिती ही आहे की देशातील बहुसंख्य शेतकरी मुक्त बाजारतच आहेत! देशातील एकूण एपीएमसी मंडळांची संख्या आवश्यक संख्येच्या केवळ 18% आहे! राष्ट्रीय शेती आयोगाने शिफारस केल्याप्रमाणे, जर प्रत्येक शेतकऱ्याला गावापासून 5 कि.मी. अंतरावर कृषी उत्पन्न बाजार समिती (मंडी) उपलब्ध करून द्यायची असेल तर देशात 42,000 मंड्या पाहिजेत. पण आज फक्त 7,700 अस्तित्वात आहेत. देशभरात सर्वत्र शेतकऱ्यांचे प्रमाण एकसारखे आहे असे गृहित धरले तर फक्त 20% शेतकरी आपला माल कृषी उत्पन्न बाजार समितीच्या मंडीत विकतात.

कृषी उत्पन्न बाजार समितीच्या मंडीत दोन प्रकारचे व्यवहार चालतात - एक म्हणजे सरकारी खरेदी, ज्याला सरकारने जाहीर केलेल्या किंमतींवर किमान समर्थन मूल्य म्हटले

जाते, आणि दुसरी म्हणजे खाजगी व्यापाऱ्यांना लिलावाद्वारे होणारी विक्री; या व्यापाऱ्यांना कृषी उत्पन्न बाजार समितीच्या मंडीत व्यापार करण्याचे परवाने दिले जातात. खाजगी व्यापाऱ्यांना थेट शेतकऱ्यांकडून शेतमाल विकत घेण्याची परवानगी नाही.

सरकारने 23 पिकांसाठी हमीभाव जाहीर केला आहे, पण मुख्यतः गहू आणि तांडूळ या दोनच पिकांसाठी सरकारी खरेदी होते. या दोन पिकांसाठी सुद्धा देशभरात या पिकांच्या एकूण उत्पादनापैकी फक्त एक तृतीयांश सरकार खरेदी करते, बाकीचे खाजगी व्यापारीच खरेदी करतात. 2015 मध्ये सादर केलेल्या शांता कुमार समितीच्या अहवालानुसार कृषी उत्पन्न बाजार समितीच्या मंडीत सरकारने केलेल्या खरेदीचा लाभ देशातील फक्त 6% शेतकऱ्यांना मिळत आहे.

विविध अहवाल असे सूचित करतात की मंडीमध्ये त्यांचे उत्पादन विकणाऱ्या शेतकऱ्यांची वास्तविक संख्या कदाचित 20% पेक्षा जास्त आहे, फार तर ती 35% पर्यंत असू शकते. म्हणजे पंतप्रधानांच्या भाषेत सांगायचं तर 60 ते 70% शेतकरी आधीपासूनच मुक्त बाजारात आहेत - कोणत्याही व्यापाऱ्याला स्वतःचा माल विकण्यासाठी स्वतंत्र आहेत!

## मुक्त बाजार शेतकऱ्यांना किती लुटतात याचा अंदाज

नव्या शेती कायद्यांचे समर्थन करताना प्रधानमंत्री जाहीरपणे म्हणाले, की कृषी उत्पन्न बाजार समित्या भ्रष्टाचाराचे अड्डे झाले आहेत आणि तिथे शेतकऱ्यांची लूट होते. पण वर दिलेल्या आकडेवारीमधून हे स्पष्ट आहे की बहुसंख्य शेतकऱ्यांचे मत वेगळे आहे. सध्या चालू असलेल्या आंदोलनात पंजाब आणि हरियाणाचे शेतकरी सर्वात मोठ्या प्रमाणात आहेत – याच दोन राज्यांत कृषी उत्पन्न बाजार समित्यांचे सर्वात उत्तम जाळे आहे - यावरूनही पंतप्रधानांचा दावा किती खोटा आहे हे लक्षात येते.

कृषी उत्पन्न बाजार समित्यांमध्ये भ्रष्टाचार आहे, आणि आडते व व्यापारी कार्टेल (गट) बनवून शेतकऱ्यांना चांगला भाव मिळू देत नाहीत हे सत्य आहे. पण शेतकऱ्यांना हे अनुभवावरून समजले आहे की कृषी उत्पन्न बाजार समितीच्या बाहेरही अशीच परिस्थिती आहे; बाहेरही व्यापारी छोट्या शेतकऱ्याच्या हलाखीच्या परिस्थितीचा गैरफायदा घेतात व त्यांना लुबाडतात. तरीही शेतकरी बाहेरच्यापेक्षा कृषी उत्पन्न बाजार समितीच्या मंडीत माल विकणे पसंत करतात, कारण मंडीमध्ये इतर फायदे आहेत, जसे की कोठार, वजन-काटे आणि व्यापाऱ्यांकडून दिल्या जाणाऱ्या रकमेची हमी वगैरे.

आर्थिक सहयोग व विकास संघटना (OECD) व भारतीय आंतरराष्ट्रीय आर्थिक संबंध अनुसंधान परिषदेने (ICRIER) मुक्त बाजारात होणाऱ्या शेतकऱ्यांच्या लुटीचा अंदाज लावला आहे. 2000-01 ते 2016-17 या 17 वर्षांच्या कालावधीत भारतीय शेतकऱ्यांच्या उत्पादनांना योग्य किंमत नाकारल्यामुळे (2017-18 च्या किंमतीनुसार) 45 लाख कोटी रुपये नुकसान झाले आहे.

याचा अर्थ मुक्त बाजारापेठांच्या अभावाने नव्हे तर देशातले बहुसंख्य शेतकरी मुक्त




बाजारच्या मर्जीवर असल्यामुळेच त्यांचे हाल झालेत आणि देशभरात शेती संकटग्रस्त आहे – फक्त 6% शेतकऱ्यांना किमान आधारभूत किंमत मिळत आहे आणि उर्वरित शेतकऱ्यांना एपीएमसीच्या आत किंवा बाहेर खाजगी व्यापाऱ्यांना विक्री करण्यास भाग पाडले जाते – जिथे व्यापारी त्यांना लुबाडतात व कमी किंमतीत विक्री करण्यास भाग पाडतात. आणि मोदींच्या कारकिर्दीत हे वेगाने घडत आहे कारण मोदी सरकारच्या काळात (2014-20) शेती क्षेत्रातील विकास दर युपीए सरकारच्या काळातील (2004-14) 3.7% वरून घसरून 3.2% झाला आहे.

**बाजार समिती नष्ट झाल्याने सार्वजनिक वितरण (रेशन) व्यवस्था धोक्यात**

देशभरात शेतकरी आंदोलन अधिक तीव्र होत असल्याने, सरकार आता असा युक्तीवाद करत आहे की बाजार समिती बंद करणे हे नव्या कायद्यात कुठेही लिहिलेलं नाही, उलट नवा कायदा शेतकऱ्यांना बाहेर कुठेही विक्री करण्याचे स्वातंत्र्य बहाल करत आहे.

सरकार यातही एक लबाडी करत आहे. हे खरे आहे की कायद्यात बाजार समितीला बंद न करता केवळ बगल दिली आहे. परंतु याचा परिणाम शेवटी बाजार समित्या संपण्यातच होणार आहे. कारण सोपं आहे. कायद्यानुसार, बाजार समितीच्या बाहेर खरेदी करणाऱ्या व्यापाऱ्यांना कर भरायला लागणार नाही, पण बाजार समितीमध्ये व्यापाऱ्यांना समितीला 4-6% कर भरावा लागेल. या विषम स्पर्धेमुळे खाजगी व्यापारी मंडीच्या आत खरेदी न करता बाहेरच खरेदी करणार. मंडीचे उत्पन्न कमी होणार, मंडीची देखरेख मागे पडणार आणि शेवटी मोडकळीच्या अवस्थेपर्यंत पोहोचणार.

उदाहरणार्थ, पंजाबमध्ये, एपीएमसीने जमा केलेला कर सुमारे 3,600 कोटी रुपये आहे, आणि याचा उपयोग गेल्या 60 वर्षात राज्यभरात उभ्या राहिलेल्या 1840 लहान मोठ्या मंड्यांचे विस्तृत जाळे राखण्यासाठी केला जातो. तसेच, पंजाबमधील प्रत्येक खेड्याला जवळच्या मंडीशी जोडणाऱ्या, ग्रामीण भागातील 70,000 किमी लांबीच्या उत्तम रस्त्यांच्या जाळ्याची देखरेखही कराच्या उत्पन्नातूनच होते.

बाजार समिती हे शासनाकडून केल्या जाणाऱ्या खरेदीचं मुख्य केंद्र आहे. जर त्याच बंद होत गेल्या तर सरकारी खरेदीही बरीच कमी होणार आणि गहू-तांदूळासाठी मिळणारा हमीभावही शेतकऱ्यांना मिळणार नाही.

एपीएमसीला बगल देणाऱ्या कायद्यामागे आणखी एक महत्त्वाचा, परंतु छुपा अजेंडा आहे – सरकारला हळूहळू धान्य खरेदी कमी करत बंदच करायची आहे आणि भारतीय अन्न महामंडळ गुंडाळून टाकायचे आहे. 2015 मध्ये सादर केलेल्या शांता कुमार समितीच्या अहवालात सार्वजनिक खरेदी व रेशनव्यवस्थेचे वितरण दोन्ही संपवून त्याऐवजी फसवा रोख

हस्तांतरणाचा पर्याय दिला आहे. खरे तर, रोख हस्तांतरणामुळे, शेतकरी किंवा ग्राहक दोघांनाही फायदा होणार नाही. भारत सरकारच्या आर्थिक सर्वेक्षण 2019-2020 मध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा कायद्यात समाविष्ट असलेल्या लाभार्थ्यांची संख्या सध्याच्या 67% वरून 20% पर्यंत कमी करण्याची मागणी केली आहे.

खरेदी कमी झाल्यामुळे आपोआपच यापुढे गहू आणि तांदळासाठीही शेतकऱ्यांना हमीभाव मिळणार नाही.

**नव्या शेती कायद्यांमागचा खरा हेतू काय?**

बाजार समितीला बगल देणाऱ्या कायद्याला बाकी दोन नव्या कायद्यांसोबत जोडून बघितले तरच या कायद्यांमागचा मोदी सरकारचा खरा हेतू लक्षात येतो. मोदींच्या एकंदर आर्थिक धोरणाशी त्याचा संबंध लक्षात घेणे गरजेचे आहे.

- **कंत्राटी शेती कायदा:** या कायद्याचा मुख्य अर्थ असा की सरकार मोठे व्यापारी आणि बड्या कंपन्यांना शेतकऱ्यांबरोबर थेट करार करण्यास आणि त्यांच्याकडून उत्पादन खरेदी करण्यास परवानगी देत आहे. यात बहुतेक लोकांना हे माहित नसते की शेतीमाल व्यापारातील मोठ्या कंपन्या किती महाकाय आहेत. उदाहरणार्थ, 2017-18 साली महाराष्ट्राच्या सर्व बाजार समिती मंड्यांमध्ये झालेल्या एकूण व्यवहाराचा आकडा 51,093 कोटी रुपये होता. त्याच वर्षात बहुराष्ट्रीय शेतमाल व्यापार कंपनी बायर-मोन्सेटोची (बायर ग्रुप) एकूण विक्री 3,674.2 कोटी युरो - म्हणजे जवळपास 2.97 लाख कोटी होती. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर, बायर ही एकटी कंपनी संपूर्ण महाराष्ट्राचा एक वर्षाचा शेतमाल विकत घेऊ शकते!
- **अत्यावश्यक वस्तू कायद्यात केलेली 'सुधारणा':** ह्यामुळे व्यापारी आणि कंपन्या किती धान्यसाठा करू शकतात यावरील सरकारी अंकुश काढून घेतले आहेत; आणि हा कायदा बाजारभावावर नियंत्रण ठेवणारा सरकारी हस्तक्षेपही संपवतो. (पदार्थांच्या किंमतीमध्ये अनेक पटीने वाढ झाली तरच सरकार हस्तक्षेप करेल असे कलम आहे.)

**तीन कायद्यांना एकत्र केल्यावर शेतीवर होणारा परिणाम**

या तीन कायद्यांचा एकत्रित परिणाम हा होणार आहे की मोठ्या देशी आणि बहुराष्ट्रीय कंपन्यांची भारतीय शेती आणि शेतमाल व्यापारावर मक्तेदारी प्रस्थापित होणार आहे.

कंत्राटी शेती कायदा व बाजार समितीला बगल देणाऱ्या कायद्यामुळे बड्या कंपन्यांना शेतकऱ्यांबरोबर थेट करार करून पाहिजे तितके पिक खरेदी करून साठवता येईल आणि किंमती वाढवता येतील. त्याचबरोबर सरकार देशव्यापी एपीएमसीचे जाळं नष्ट करून, हळूहळू सरकारी खरेदी संपुष्टात आणण्यासाठी तसेच रेशन व्यवस्था नष्ट करण्यासाठीही पावले उचलत आहे. रेशन व्यवस्थेची महागाई कमी करण्यात महत्त्वाची भूमिका होती. व्यापाऱ्यांकडून साठेबाजी आणि सट्टेबाजारीमुळे किंमती अव्वाच्या सव्वा वाढू लागल्या तर

सरकार तातडीने आपल्या साठ्यामधून धान्य बाजारात आणून किंमतींवर लगाम लावू शकत होतं. आता हे नियंत्रण संपणार आणि अन्नधान्याच्या (गहू-तांदळाच्या) किंमतींवरही सट्टेबाजार चालणार.

या कायद्यांचे समर्थक असा युक्तीवाद करतील की बाजारात अनेक कंपन्या असल्याने त्यांच्यात स्पर्धा होईल आणि त्यामुळे शेतकऱ्यांना चांगला भाव मिळेल! हे मुख्य प्रवाहातील अर्थशास्त्र पूर्णपणे चुकीचे आहे; महाकाय कंपन्या एकामेकांशी किंमतींची स्पर्धा करत नाहीत; कारण ह्या कंपन्या इतक्या मोठ्या आहेत की त्यांनी जर परस्परात किंमतींची स्पर्धा केली तर त्या एकमेकांनाच नष्ट करतील. त्यामुळे किमतीच्या बाबतीत त्या परस्पर सहकार्याच्या मार्गानेच काम करतात. त्या संघ (कार्टेल्स) बनवतात आणि एकमेकांमध्ये बाजार विभागून घेतात.



ह्या बलाढ्य कंपन्या संपूर्ण प्रदेशातील शेतकऱ्यांसोबत करार करतील, मोठे भांडवल गाठीशी असल्यामुळे सुरुवातीला शेतकऱ्यांना चांगला भाव देतील. साठेबाजीवरील मर्यादा काढून टाकल्यामुळे आणि कृषी उत्पन्न बाजार समिती कायदा मोडीत काढल्यामुळे ते शेतकऱ्यांकडून मोठ्या प्रमाणात पिके खरेदी करतील आणि साठवून ठेवू शकतील. अशा प्रकारे, काही वर्षातच ह्या महाकाय बहुराष्ट्रीय कंपन्या भारतातील शेतमाल व्यापारावर मक्तेदारी प्रस्थापित करतील. जेव्हा त्यांची मक्तेदारी प्रस्थापित होईल, तेव्हा सर्व छोटे व्यापारी संपुष्टात येतील. त्यानंतर ह्या कंपन्याच शेतमालाचा भाव ठरवतील आणि शेतकऱ्याला कमी भाव देतील, कारण तेव्हा शेतकऱ्यांपुढे दुसरा काहीच पर्याय नसेल.

**भारतातील सर्व कष्टकऱ्यांवर होणारा परिणाम**

पहिला दूरगामी परिणाम म्हणजे लहान शेतकरी पिळले जातील, त्यांना शेती सोडण्यास भाग पाडले जाईल आणि कृषी व्यवसाय कंपन्या त्यांच्या जमिनींवर ताबा मिळवतील आणि प्रचंड मोठे फार्म्स उभे करतील. यात जराही अतिशयोक्ती नाही. इतर विकसित देशांमध्ये हेच घडले आहे आणि अनेक विकसनशील देशांमध्ये हे सध्या घडत आहे.

दुसरा परिणाम म्हणजे मंड्यांमध्ये शेतकऱ्यांकडून माल विकत घेणाऱ्या लाखो छोट्या व्यापाऱ्यांचे-ज्यांना आडती म्हणतात-व्यवसाय बंद पडतील. अनेक जण असा युक्तीवाद करतील की आडती सुद्धा संघ (कार्टेल) बनवून शेतकऱ्यांना लुबाडत आले आहेत, मग त्यांचे व्यवसाय बंद पडले तर त्यात काय वाईट आहे. पण छोटे आडती काढून त्यांच्या जागी मोठ्या कंपन्यांना बसवणे हा रोगापेक्षा इलाज भयंकर असे आहे. घरातील घाण काढण्यासाठी आपण स्वच्छता करतो, घर जाळून टाकत नाही, तसंच बाजार समितीतील भ्रष्टाचार बंद करण्याची गरज आहे, बाजार समिती नाही. शेतकरी संघटनांना विश्वासात घेऊन

बाजार समितीचा कारभार अधिक लोकशाहीवादी आणि चोख कसा होईल यासाठी पावले उचलण्याची गरज आहे.

तिसरा आणि सगळयात महत्त्वाचा परिणाम म्हणजे ह्यामुळे देशातील 'उपासमार आणि कुपोषणाची समस्या' आणखीच गंभीर होईल. मंड्या ह्या सरकारच्या अन्नधान्य खरेदीच्या मुख्य केंद्र आहेत. म्हणून मंड्या नष्ट करून खाजगी व्यापारांना शेतकऱ्यांकडून थेट खरेदी करण्यास परवानगी देऊन, मोदी सरकारने पहिल्या कार्यकाळात जाहीर केलेली आणखी एक प्रिय योजना राबवण्याच्या दिशेने पुढचे पाऊल टाकले आहे - अन्नधान्याची सरकारी खरेदी बंद करून हळूहळू सार्वजनिक वितरण व्यवस्था संपवून त्याऐवजी शेतकरी आणि ग्राहकांच्या खात्यांत थेट रक्कम जमा करण्याची योजना. हे मोदी सरकारचे घोषित उद्दिष्ट आहे. यामुळे केवळ सरकारच्या हस्तक्षेपाने शेतकऱ्यांना त्यांच्या पिकांना योग्य दर मिळाल्याच्या सर्व आशा संपविल्या जात नाहीत, तर रेशन व्यवस्था मोडित काढल्यामुळे खाजगी व्यापारी साठेबाजी करून अन्नधान्यांच्या किमती वाढवतील - **खरंतर साठेबाजीला आणि भाववाढीला आळा घालण्यासाठीच सार्वजनिक वितरण व्यवस्था देशात लागू केली गेली होती.** अर्थातच तेव्हा सरकारला गरीबांना देण्यात येणारे रोख अनुदान वाढवावे लागेल, जे सरकार करणार नाही कारण रेशन व्यवस्था मोडकळीत काढण्याचा मूळ हेतूच हा आहे की अन्न-सुरक्षेवरील सरकारी खर्च कमी करणे. त्यामुळे हे कायदे म्हणजे देशातील कोट्यवधी गरीब जनतेवर महासंकट कोसळणार आहे.

शेवटी, भारताच्या अन्न-सुरक्षेवर आणि सार्वभौमित्वावर याचा घातक परिणाम होणार आहे.

### भारतीय शेतीला बहुराष्ट्रीय शेती कंपन्यांच्या ताब्यात देणे

भारतात जगातली सर्वोत्तम कृषी जमीन असल्यामुळे अनेक वर्षांपासून परकीय बहुराष्ट्रीय शेतमाल कंपन्यांचा भारताच्या शेतीवर डोळा आहे. उष्णकटीबंधीय देश असल्यामुळे भारतात विविध प्रकारची पिके घेतली जातात – अनेक प्रकारच्या भाज्या, फळे, तसेच धान्य, कडधान्य, तेलबिया, या सर्वांचा समावेश आहे. दुसरीकडे, जगातील थंड समशीतोष्ण प्रदेश, जिथे बहुतेक पाश्चात्य विकसित देश आहेत तिथे पिकांचं वैविध्य नाही. वर्षभर इतकी पिके घेणेही शक्य नाही. म्हणून युरोप-अमेरिकेच्या कृषी कंपन्यांना एका बाजूला भारतीय शेतीवर कब्जा करून आपल्या जमिनीचा उपयोग त्यांना आवश्यक असलेली पिके घेण्यासाठी करायचा आहे, तर दुसऱ्या बाजूला ते भारतावर धान्य आयात करण्यासाठी दबाव टाकत आहेत. वरवर पाहता हे मॉडेल भारतासाठी फायद्याचे वाटू शकते कारण आपण फळे, फुले, भाज्या अशी महाग पिके निर्यात करायची आणि गहू-तांदळासारखी स्वस्त पिके आयात करायची. पण प्रत्यक्षात जागतिक भांडवलशाहीने पसरवलेली ही एक भाकडकथा आहे. कारण जागतिक पातळीवर सर्व शेतमालाचा व्यापार युरोप-अमेरिकेच्या कृषी कंपन्यांच्या नियंत्रणाखाली आहे. ते जागतिक पातळीवर भाव

ठरवतात. आपण जेव्हा युरोप-अमेरिकेला फळे, भाज्या, फुले निर्यात करू, तेव्हा निर्यातीवर व किंमतींवर त्यांचे नियंत्रण असल्याने आपल्या मालाला कमी किंमत मिळणार आणि जेव्हा आपण त्यांच्याकडून धान्य आयात करू, तेव्हाही व्यापार ते नियंत्रित करत असल्यामुळे आपण आयात करत असलेल्या गहू-तांदूळाचा भाव प्रचंड महाग असेल. पण हे इतकेच नाहीये. यात सर्वात महत्त्वाची समस्या ही आहे की अन्नधान्य ही मूलभूत गरज आहे, फळे-फुले नाहीत. जर इतक्या मूलभूत अन्न पदार्थासाठी आपण पाश्चात्य विकसित देशांवर अवलंबून राहिलो, तर आपल्या अन्नपुरवठ्याची सूत्र या देशांच्या हाती जातील. आपले स्वातंत्र्य आणि सार्वभौमत्वही धोक्यात येईल. ते देश भारतावर कोणत्याही अटी सहज लादू शकतील.

यात जराही अतिशयोक्ती नाही. आफ्रिकेत हेच घडले आहे. आफ्रिकेच्या बहुतांश देशांनी पाश्चात्य कंपन्यांच्या हातात आपल्या शेतीची सूत्र दिल्यामुळे त्या देशांमध्ये अन्नधान्य सोडून प्राधान्याने निर्यातीसाठी नगदी पिके उगवली जातात. म्हणून या देशांमध्ये सतत भयंकर मानवनिर्मित दुष्काळ होत असतात.

अशा प्रकारे, तीन नवे कृषी कायदे पारित करून, 'देशभक्त' भाजप सरकारने भारतीय शेती परदेशी शेती कंपन्यांच्या ताब्यात देण्याची पूर्ण तयारी केली आहे आणि देशाला भूकबळी व दुष्काळाकडे ढकलले आहे. हे सर्व देशविघातक कृत्य कोरोना महामारीतील लॉकडाऊनचा गैरफायदा घेऊन केले आहे.

**शेतकऱ्यांचा लढा हा आपल्या सर्वांचा लढा आहे! सामील व्हा!**

त्यामुळे शेतकऱ्यांनी पुकारलेले आंदोलन फक्त त्यांचे नाही, हा आपल्या सर्वांचा लढा आहे. देशातील सर्व लोकांचा आणि आपली अन्न सुरक्षा व देशाची सार्वभौमिकता वाचवण्याचा लढा आहे.



आपणा सर्वांना मिळून सरकारला हे तीन कृषी कायदे रद्द करण्यास भाग पाडण्यासाठी कठोरपणे संघर्ष करावा लागेल. परंतु हा संघर्ष तिथेच संपता कामा नये. देशातील शेती व्यवस्था बड्या कंपन्यांच्या फायद्यासाठी न चालता, भारतातील छोट्या शेतकऱ्यांना आधार देणारी असावी. त्यासाठी कृषी क्षेत्रात सरकारला गुंतवणूक वाढविण्याची आवश्यकता आहे; स्वामिनाथन आयोगाच्या शिफारशींची अंमलबजावणी करण्याची गरज आहे; शेतीमध्ये संशोधनासाठी सरकारला अधिक खर्च करायची गरज आहे आणि बियाणे, खते, कीटनाशके या क्षेत्रातील कंपन्यांचे वाढते प्रभुत्व संपवण्याची गरज आहे, आणि रेशन व्यवस्था अधिक बळकट आणि सार्वत्रिक करण्याची गरज आहे.

**शेतकरी-कामगार-विद्यार्थी एकजूट जिंदाबाद!**

## आमच्याबद्दल: लोकायत

गेली तीन दशके जागतिकीकरणाच्या नावाखाली महाकाय बहुराष्ट्रीय कंपन्यांना या देशात आमंत्रित केलं जात आहे. देश आज फक्त बड्या देशी-विदेशी उद्योगपतींच्या नग्न नफेखोरीसाठीच चालवला जात आहे. ते प्रचंड नफ्याच्या हावेपोटी गरिबांची जंगले, जमिनी, पाणी आणि आता शेतीवर हिंस्त्रपणे हल्ले करत आहेत. यात त्यांना पोलीस-न्यायालय-राजकारणी-नोकरशहा यांचे उघडउघड सहकार्य मिळत आहे. 'विकासाच्या' नावाखाली जनतेच्या श्रमांनी आणि पैशांनी उभे केलेले सार्वजनिक उद्योग, बँका व विमा कंपन्या कवडीमोल किंमतीत महाकाय कंपन्यांना सोपवल्या जात आहेत. संपुर्ण शेती क्षेत्र त्यांच्या ताब्यात देण्यासाठीच तीन कृषी कायदेही आणले गेले आहेत. आता आपल्या देशावर कुणी थेट राज्य करण्याची गरज नाही. आर्थिक नाड्या आपल्या हातात एकवटून देशी-विदेशी कंपन्या आपल्याला एका नव्या गुलामीत ढकलत आहेत.

एकीकडे अर्थव्यवस्था मोडकळीस आली आहे, मात्र दुसरीकडे लोकांमध्ये धर्माच्या नावावर फूट पाडण्याचे सातत्याने प्रयत्न होत आहेत. जातीय द्वेषातून दलितांवर रोजच अत्याचार होत आहेत. लोकशाहीचा चौथा स्तंभ म्हणजे प्रसारमाध्यमे ही जनतेची बाजु मांडण्याऐवजी फॅसिस्ट राज्यकर्त्यांचे बटीक बनून राहिली आहेत.

पण आपण निराशा सोडली पाहिजे. सुंदर भविष्याचे स्वप्न पाहिले पाहिजे. विश्वास ठेवला पाहिजे की जग बदलता येऊ शकते. ह्यासाठीच आम्ही सामान्य लोक मिळून गेल्या अनेक वर्षांपासून **'लोकायत'** ही संघटना चालवतो व विविध कार्यक्रम करतो. जर तुम्हाला आमच्याबद्दल अधिक जाणून घ्यायचे असेल किंवा आमच्या उपक्रमांमधे सहभागी व्हायचे असेल, तर तुम्ही खालील पत्त्यावर आमच्याशी संपर्क करू शकता.

---

**प्रकाशक व मुद्रक:**
लोकायत, कॅनरा बँकेसमोर, लॉ कॉलेज रोड, नळ स्टॉपजवळ, पुणे 4.
*(दर रविवार संध्याकाळी 5 ते 7:30 या वेळेत लोकायतची मीटिंग होते.)*

ऋषिकेश – 94235 07864 अलका – 90670 03838
www.lokayat.org.in @lokayat LokayatPune
Lokayat.India Abhivyakti.Pune KafilaOfficial




---

ही पुस्तिका यांच्या पाठिंब्याने – अंगणवाडी कर्मचारी सभा *(सुनंदा साळवे)*, बांधकाम मजदूर सभा, डबा बारदाण कष्टकरी पंचायत *(लक्ष्मण लोंढे)*
**मुद्रणस्थळ:** आर. एस. प्रिंटर्स, 455, शनिवार पेठ, पुणे 30.

**पहिली आवृत्ती:** फेब्रुवारी 2021




**सहयोग मुल्य: ₹ 5/-**